**मौजे झुल्लर (ता.राळेगांव, जि. यवतमाळ) येथे पूरग्रस्तांचे पुनर्वसनासाठी संपादन केलेल्या जमिनीचा भूसंपादन अधिनियम १८९४ मधील कलम १८ नुसार वाढीव मोबदला अदा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एफएलडी-२०१९/प्र.क्र.९४/र-१२**
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३.१२.२०१९

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.अ.क.वा/न्याय प्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-२, दि.२४.१२.२००३.
२) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र.अका/राजस्व-५/कावि/३१७/२०१९, दि.३०.७.२०१९.
३) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र.अका/राजस्व-५/कावि/३४०/२०१९, दि.३.९.२०१९.
४) शासकीय अभियोक्ता, मा.उच्च न्यायालय, नागपूर यांचे पत्र क्र.१२२४१/WP/SPD/२०१९, दि.३१.८.२०१९.
५) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र.अका/राजस्व-५/कावि/४५५/२०१९, दि.१६.११.२०१९.

प्रस्तावना -

मौजे झुल्लर जिल्हा यवतमाळ येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी मौजे वडकी तालुका राळेगाव जिल्हा यवतमाळ येथील श्री.सोमेश्वर दिगंबरराव महाजन यांची २.०२ हेक्टर आर क्षेत्र शेतजमीन झुल्लरचे पुनर्वसन गावठाणाकरिता संपादित करण्यात आली. प्रस्तुत प्रकरणी भूधारकाने मा.दिवाणी न्यायालय (व.स्तर), यवतमाळ यांचेकडे दाखल केलेल्या दरखास्त याचिका क्र.१२/२०१५ मध्ये अर्ज निशाणी क्र.४६ प्रकरणी दि.७.१२.२०१८ रोजी व त्यानंतर अर्ज निशानी क्र.५४ प्रकरणी दि.५.७.२०१९ रोजी दिलेल्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे अपील दाखल करण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी संदर्भिय क्र.१ च्या पत्रान्वये शासनास सादर केला. सदर प्रस्तावास अनुसरुन जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना मा.उच्च न्यायालयामध्ये अपिल दाखल करण्यास परवानगी देण्यात आली होती. शासकीय अभियोक्ता, मा.उच्च न्यायालय, नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयात शासनाविरुध्द निकाल लागण्याची शक्यता असल्याने, प्रस्तुत प्रकरणी अपील करण्याबाबत पुनर्विचार करण्याची जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना विनंती केली. त्यानुषंगाने, प्रस्तुत प्रकरणी शासन स्तरावर उचित मार्गदर्शन करण्याची जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये, शासनास विनंती केली होती.

त्यास अनुसरुन विधि व न्याय विभाग, नागपूर यांचे अभिप्राय विचारात घेऊन प्रस्तुत प्रकरणी मा.उच्च न्यायालयामध्ये अपिल दाखल करण्यात येऊ नये असा निर्णय शासनस्तरावर घेण्यात आला आहे. त्यास अनुसरुन मा.दिवाणी न्यायालय (व.स्तर), यवतमाळ यांनी दरखास्त याचिका क्र.१२/२०१५ मध्ये अर्ज निशाणी क्र.४६ प्रकरणी दि.७.१२.२०१८ रोजी व त्यानंतर अर्ज निशानी क्र.५४ प्रकरणी दि.५.७.२०१९ रोजी दिलेल्या आदेशांच्या अनुषंगाने संबंधितांस भूसंपादन अधिनियम १८९४ मधील कलम १८ नुसार वाढीव मोबदला अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

मौजे झुल्लर जिल्हा यवतमाळ येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी मौजे वडकी, तालुका राळेगाव, जिल्हा यवतमाळ येथील श्री. सोमेश्वर दिगंबरराव महाजन यांची २.०२ हेक्टर आर क्षेत्र शेतजमीन झुल्लरचे पुनर्वसन गावठाणाकरिता संपादित करण्यात आली होती. सदर प्रकरणी मा. दिवाणी न्यायालय (व.स्तर), यवतमाळ यांनी दरखास्त याचिका क्र.१२/२०१५ मध्ये अर्ज निशाणी क्र.४६ प्रकरणी दि.७.१२.२०१८ रोजी व त्यानंतर अर्ज निशानी क्र.५४ प्रकरणी दि.५.७.२०१९ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन भूसंपादनाचा अंतिम मोबदला संबंधितांस अदा करण्यासाठी रु.१,४१,००,०००/- (रुपये एक कोटी एकेचाळीस लाख फक्त) निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना "मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, (९३) इतर, (९३) (०३) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, घरे इ. बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसान भरपाई देणे (अनिवार्य), ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" (२२४५ ०१८२) या लेखाशीर्षाखाली खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात यावा.

१) भूधारक श्री. सोमेश्वर दिगंबरराव महाजन यांनी मा .दिवाणी न्यायालयामध्ये त्यांना देय असलेली रक्कम मिळण्यास होत असलेल्या विलंबाबाबत दि.२८.०२.२०१९ रोजी रु.१,३१,७९,२७१ -/एवढी रक्कम देय ठरत असल्याबाबत जप्ती वॉरट दाखल केला आहे.
त्यामुळे जप्ती वॉरट मध्ये केलेल्या मागणीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी कार्यालयाने परिगणित केलेले प्रतिमाह रु.९५,६४६/- इतके व्याज विचारात घेऊन दि.३०.११.२०१९ पर्यंत भूधारकास व्याजासह रु.१,४०,४०,०८६/-एवढी रक्कम देय ठरते. हे लक्षात घेता विभागीय आयुक्त, अमरावती यांना रु.१,४१,००,०००/- इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२) वर नमूद रु.१,४१,००,०००/- इतकी रक्कम जरी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्यात येत असली तरी भूधारकाने दि.२८.०२.२०१९ रोजी दाखल करण्यात आलेल्या जप्ती वॉरंट मध्ये केलेल्या मागणीनुसार, संबंधितांस प्रत्यक्ष अदा करावयाच्या दिनाकांपर्यंत देय ठरत असलेल्या रकमेची सविस्तर परिगणनेची खात्री करुन नंतरच प्रत्यक्ष देय ठरत असलेली रक्कमच संबंधितांस तात्काळ अदा करण्यात यावी व उर्वरित रक्कम शासनास समर्पित करण्यात यावी.

३) उपरोक्त रक्कम मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर खर्च होणार नाही यांची विभागीय आयुक्त, अमरावती यांनी दक्षता घ्यावी.

४) मा. न्यायालयाचा निर्णयानूसार वाढीव मोबदला अदा करण्यास विलंब होणार नाही यांची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेला कोणताही निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

८) संबंधित अधिकारी यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

९) वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०३१७०३२८३६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chularam R Nikhare

Digitally signed by Chularam R Nikhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdf fbadf353be3592552a31, cn=Chularam R Nikhare
Date: 2019.12.03 17:07:09 +05'30'

**(चु.रा.निखारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), अमरावती विभाग, अमरावती
२. उप आयुक्त (पुनर्वसन), अमरावती
३. जिल्हाधिकारी, यवतमाळ
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
७. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११/ ब-१/ पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
८. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.